कृषि विभागातील गट-अ ते गट - ब अधिका-यांचे बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः आकृवि १२१४/प्र.क्र.२४७ /१५अे
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.
तारीख: ०२ जुन, २०१५.

वाचा :-

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ .
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही -२०१४ / व्हीआयपी/ २८४/ प्र.क्र.३६२/१२, दि.२६.११.२०१४.

## प्रस्तावना :-

शासकीय कर्मचा-यांचे बदलीचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतुद करण्याकरिता अधिनियम २००५ अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम - ६ मध्ये गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी निश्चित करण्यात आलेले आहेत. सदर अधिनियमातील कलम- ६ मधील परंतुक २ व कलम ७ मधील तरतुदीनुसार कृषि विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम -६ मधील परंतुक २ व कलम ७ नुसार कृषि विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांची बदली करण्याचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | अधिका-यांच्या पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार गट | महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकारी | बदली करण्याचा अधिकार प्रत्यार्पित करावयाचा सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | कृषि संचालक<br>( वेतनश्रेणी रु.१४३००-१८३०० ) | मा.मुख्यमंत्री | बदल प्रस्तावित नाही. |

| अ. क्र. | अधिका-यांच्या पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार गट | महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकारी | बदली करण्याचा अधिकार प्रत्यार्पित करावयाचा सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|
| २ | कृषि सह संचालक ( वेतनश्रेणी रु.१२०००-१६५०० ) | मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री (कृषि) |
| ३ | अधिक्षक कृषि अधिकारी ( वेतनश्रेणी रु.१०६५०-१५८५० ) | मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री (कृषि) |
| ४ | सामान्य राज्य सेवा गट-अ ( वरीष्ठ प्रशासन अधिकारी ) वेतनश्रेणी रु.१००००-१५२०० ) , महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ ( वेतनश्रेणी रु.८०००-१३५००) सामान्य राज्य सेवा गट-अ (प्रशासन अधिकारी वेतनश्रेणी रु.७४५०-११५००) | अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव ( कृषि ) यांचेशी विचार विनिमय करुन कृषि विभागाचे प्रभारी मंत्री | आयुक्त (कृषि) |
| ५ | महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब वेतनश्रेणी रु.६५००-१०५०० विशेष वेतन रु.४००) सामान्य राज्य सेवा गट-ब ( वेतनश्रेणी रु.६५००-१०५०० ), गट-ब ( स्वियसहाय्यक ) वेतनश्रेणी रु.७४५०-११५०० ) | अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव (कृषि ) यांचेशी विचार विनिमय करुन कृषि विभागाचे प्रभारी मंत्री | आयुक्त (कृषि) |
| ६ | महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब ( कनिष्ठ ) राजपत्रित ( वेतनश्रेणी रु.६५००-१०५०० ) | अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव ( कृषि ) यांचेशी विचार विनिमय करुन कृषि विभागाचे प्रभारी मंत्री | विभागा अंतर्गत विभागीय कृषि सह संचालक / आंतरसंभाग आयुक्त (कृषि) |

अनियतकालीक बदल्या करताना एक टप्पा वरीष्ठ सक्षम प्राधिका-याची मान्यता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१६०१०३६००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Maroti K Kendre

Digitally signed by Maroti K Kendre
DN: CN = Maroti K Kendre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.02 17:51:24 +05'30'

**( मा.के.केन्द्रे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

४. अप्पर मुख्य सचिव (कृषि यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.

५. आयुक्त ( कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. कृषि सह संचालक ( आस्थापना ), कृषि आयुक्तालय, पुणे

७. सर्व विभागीय कृषि सह संचालक ( व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे )

८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ( व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे )

९. निवड नस्ती /१५ अे